**राज्यातील सर्व जिल्हा परिषदांमध्ये, बांधकाम विषयक कामासाठी प्रोजेक्ट मॅनेजमेंट सिस्टीम (PMS) ही प्रणाली राबविण्याबाबत (शुध्दीपत्रक).**

**महाराष्ट्र शासन**
ग्राम विकास विभाग
शासन शुध्दीपत्रक क्रमांकः आयटी-२०१७/प्र.क्र.४२ (भाग-३) /मातंक
बांधकाम भवन,२५,मर्झबान पथ
फोर्ट,मुंबई-४००००१
तारीख: ०६ नोव्हेंबर,२०१९

**वाचा -**

या विभागाचा शासन निर्णय क्र. आयटी-२०१७/प्र.क्र.४२/मातंक, दि. ०६ जुलै, २०१९.

**शासन शुध्दीपत्रक -**

संदर्भांकित दि.०६ जुलै,२०१९ रोजीच्या शासन निर्णयातील परिच्छेद १ मधील अ.क्र.८ मध्ये सुचना क्र. ८.१) ते ८.६) देण्यात आल्या आहेत. सरद सुचनांमध्ये खालीलप्रमाणे सुधारणा करण्यात येत असून त्यानुसार सुचना पुढीलप्रमाणे दुरूस्ती करून वाचण्यात याव्यात.

८. प्रोजेक्ट मॅनेजमेंट सिस्टिम मध्ये मोजमाप पुस्तिकेबाबत खालील सूचनांचे पालन करण्यात यावे.

८.१) प्रोजेक्ट मॅनेजमेंट सिस्टीमवरून प्रिंट काढुन मोजमाप पुस्तीकेला चिकटवू नये. त्याऐवजी सदरहू प्रिंट शाखा अभियंता, उपअभियंता तसेच कार्यकारी अभियंता यांनी मोजमापांची अंतीम तपासणी केल्यानंतर विभागीय स्तरावर काढण्यात यावी.

८.२) प्रोजेक्ट मॅनेजमेंट सिस्टीम मध्ये कोणत्या अभियंत्याने हा डेटा सिस्टीममध्ये भरला आहे. त्याची ओळख सिस्टीममधून उपलब्ध करावी.

८.३) सदर प्रिंट आऊटलाच संगणककीय मोजमाप पुस्तीकेचा दर्जा देऊन सदर प्रिंटआऊट वर प्रणालीमार्फत जो PMS नंबर असेल त्यालाच MB नंबर (मोजमाप पुस्तीका क्रमांक) संबोधण्यात यावे.

८.४) प्रत्येक पानावर शाखा अभियंता व उपअभियंता यांची डिजीटल स्वाक्षरी/ई-स्वाक्षरी असावी. तसेच कार्यकारी अभियंता यांची डिजीटल स्वाक्षरी असलेली प्रत अंतीम मानन्यात यावी.

८.५) सदर प्रिंटआऊट एकत्रितपणे स्टॅपल करून मुळ नस्तीला जोडण्यात येऊन कायम स्वरूपी जतन करावी.

८.६) महाराष्ट्र जिल्हा परिषद लेखा संहिता १९६८ मधील नियमात आवश्यक त्या उपरोक्त प्रमाणे सुधारणा यथावकाश करण्यात याव्यात.

सदरचे शासन शुध्दीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक **२०१९११०५१६२९३५६३२०** असा आहे. सदर शासन शुध्दीपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

.

Aseem Surendrakumar Gupta

Digitally signed by Aseem Surendrakumar Gupta
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Rural Developement Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=42cb1d992ceadc1f5fea3c14e1cedf9b5ea392a9c81fdbde5629e68c9158678b, cn=Aseem Surendrakumar Gupta
Date: 2019.11.06 11:21:06 +05'30'

**(असीम गुप्ता )**
**प्रधान सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) अपर मुख्य सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, ७ वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई ४०० ००१.
२) प्रधान सचिव सार्वजनिक बांधकाम विभाग , मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
३) सचिव , मृद व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
४) सचिव , (मु.ग्रा.स. यो.), ग्रामविकास विभाग, मुंबई
५) सर्व सह सचिव/ उपसचिव, ग्रामविकास विभाग, मुंबई
६) सर्व विभागीय आयुक्त,
७) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद.
८) सर्व मुख्य लेखा व वित्त अधिकारी , जिल्हा परिषद.
९) संचालक, प्रगत संगणक विकास केंद्र (सीडॅक), सीडॅक इनोवेशन पार्क, पंचवटी, पाषाण, पुणे-४११ ००८.
१०) निवड नस्ती ( माहिती तंत्रज्ञान कक्ष), ग्रामविकास विभाग , मंत्रालय.मुंबई